सन २०१४-१५ साठी एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) अंतर्गत ८५% केंद्र हिस्सा व १५ टक्के राज्य हिश्श्याची रक्कम वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राफअ २०१४/प्र.क्र.८२/९अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १२ फेब्रुवारी, २०१५

**वाचा:-**

१) **केंद्र शासनाचे पत्र क्रमांक एफ-नं.३३-४०/२०१४-हॉर्टी, दिनांक , १७ एप्रिल, २०१४.**
२) **केंद्र शासनाचे पत्र क्रमांक एफ-नं.१८-३२/२०१२-NHM, दिनांक , १ जुलै, २०१४.**
३) **शासन निर्णय, कृषी व पदुम विभाग,क्र.संकीर्ण-१६१४/प्र.क्र.८५/१४-अे, दिनांक १०/७/२०१४**
४) **शासन निर्णय,कृषी व पदुम विभाग , समक्रमांक, दिनांक १९ सप्टेंबर,२०१४**
५) **केंद्र शासनाचे पत्र क्रमांक एफ-नं.१८-३२/२०१२-NHM, दि.१० डिसेंबर,२०१४**
६) **संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांचे पत्र क्रमांक.मराफऔवमं/ लेखा/५७८१/२०१४ दि.२६/१२/२०१४**
७) **शासन पुरक पत्र,कृषी व पदुम विभाग,क्र.संकीर्ण-२०१४/प्र.क्र.१३२/९ अे,दि.१२/०२/२०१५**

**प्रस्तावना**

राज्यात सन २००५-०६ या आर्थिक वर्षापासून केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यात येत आहे. केंद्र शासनाने सन २००५-०६ व २००६-०७ मध्ये राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यासाठी १००% निधी उपलब्ध करुन दिला होता. सन-२००७-०८ या आर्थिक वर्षापासून सन २०१३-१४ पर्यंत सदर अभियान राबविण्यासाठी केंद्र शासनाचा ८५% हिस्सा व राज्य शासनाचा १५% हिस्सा या प्रमाणे हा कार्यक्रम राबविण्यात येत होता. सन २०१४-१५ पासून सदर योजना ही एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान म्हणून राबविण्यात येत असून त्यामधील केंद्र हिस्सा ८५% व राज्य हिस्सा १५ % असे प्रमाण असणार आहे.

केंद्र शासनाने त्यांच्या उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये रु.१८७, ००, ००,०००/- कोटी (रूपये एकशे सत्त्याऐशी कोटी फक्त) एवढया रक्कमेच्या कार्यक्रमास मान्यता दिली आहे. तसेच केंद्र शासनाने सदर अभियानाकरीता मंजूर केलेल्या रु.१८७,००,००,०००/- रक्कमेच्या कृती आराखडयापैकी केंद्र हिश्याच्या ८५% हिश्यातील प्रथम हप्त्यापोटी संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये रू.५०, ००, ००,०००/- कोटी (रुपये पन्नास कोटी फक्त) एवढा निधी उपलब्ध करून दिला आहे. सदर निधी तसेच त्यास अनुसरून राज्य हिश्याची १५% म्हणजेच रू.८,८२,३५,२९३ (रूपये आठ कोटी ब्याऐंशी लाख पस्तीस हजार दोनशे त्र्याण्णव फक्त) एवढा निधी संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला आहे.

आता केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये प्रस्तुत योजनेसाठीच्या दुस-या हप्त्याची रु.२५,००,००,०००/- एवढा निधी उपलब्ध करून दिलेला असून त्याअनुषंगाने व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे यांनी त्यांच्या संदर्भ क्र.६ च्या पत्रान्वये याबाबतचा प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी सादर केलेला आहे.सदर निधी तसेच त्या अनुरूप राज्य शासनाच्या हिश्श्याची रक्कम रु.४,४१,१७,६४७/- वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय

महाराष्ट्र राज्याने फलोत्पादनाच्या क्षेत्रात केलेल्या उल्लेखनिय कामगीरीची जाहिरात व प्रसिध्दी करण्यासाठी , एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान अंतर्गत राज्य शासनाच्या हिश्श्याच्या रकमेपैकी रु.१५,००,००,०००/- एवढा निधी , संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला आहे.तथापि सदर बाबीसाठी राष्ट्रीय कृषी विकास योजनेतून आवश्यक तो निधी स्वतंत्रपणे उपलब्ध करून देण्यात आला असल्याने उक्त रु.१५,००,००,०००/- निधी वरील बाबीसाठी खर्च करण्यात आलेला नाही.

२. केंद्र शासनाने सन २०१४-१५ करीता एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) राबविण्यासाठी केंद्र हिस्सा (८५ टक्के) द्वितीय हप्त्यापोटी रू.२५,००,००,०००/- (रुपये पंचवीस कोटी फक्त ) एवढा निधी उपलब्ध करून दिला आहे. त्यास अनुसरुन यापूर्वीच संदर्भ क्र.३ च्या शासननिर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या उपरोक्त रु.१५,००,००,०००/- एवढया निधीतून राज्य शासनाचा हिस्सा (१५ टक्के) निधी रू.४,४१,१७,६४७/- (रूपये चार कोटी एक्केचाळीस लाख सतरा हजार सहाशे सत्तेचाळीस फक्त) खर्च करण्यात यावा. मात्र रु.१५,००,००,०००/- या रकमेमधून वरील रु.४,४१,१७,६४७/- रक्कम वजा जाता उर्वरीत रक्कम संदर्भ क्र.७ मधील पुरक पत्रामध्ये नमूद केल्यानुसार शासनाच्या मान्यतेशिवाय खर्च करण्यात येऊ नये. **अशा प्रकारे एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान या योजनेसाठी केंद्र हिस्सा (८५ टक्के) द्वीतीय हप्त्यापोटी रु.२५,००,००,०००/-(रुपये पंचवीस कोटी फक्त)** एवढा निधी खालील मंजूर लेखाशिर्षातील सन २०१४-१५ च्या मंजूर तरतुदींतून खर्च करण्यास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

१) मागणी क्रमांक डी - ३
मुख्य लेखाशिर्ष-२४०१ - पीक संवर्धन,
११९ - बागायती व भाजीपाला पिके,
११९ - (०३) रोपमळे
(०३)(३७) एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान - केंद्र हिस्सा ८५ %
(२४०१ ९५६३)
३३ अर्थसहाय्य

३. या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांच्याकडे एक रकमी सुपूर्द करण्यासाठी लेखा अधिकारी , महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे-५ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वरील प्रमाणे मंजूर केलेला निधी अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत व मासिक निधी विवरण पत्राप्रमाणे वित्त विभागाने विकसीत केलेल्या "संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणाली" मध्ये शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध आहे. शासन निर्णयाची काटेकोरपणे अमंलबजावणी होईल याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. या योजनेसाठी खर्च करताना सर्व वित्तीय नियम, विनियम, वित्तीय शासन निर्णय, अधिसूचना, आदेश, केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना आणि भारताचे नियत्रंक व महालेखापरिक्षक यांचे या संदर्भातील निरिक्षण आणि खर्चात अनियमतता होणार नाही यांचे पालन होईल या अटीच्या अधिन राहून निधी खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने आणि त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०९/ अर्थ-१३, दिनांक ६/२/२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१२१६१३३५२३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAKHARKAR AMOL NILKANTH

Digitally signed by SAKHARKAR AMOL NILKANTH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AAHDDF,CID - 920025, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAKHARKAR AMOL NILKANTH
Date: 2015.03.02 15:54:44 +05'30'

**अ.नि.साखरकर**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

**१. मा. मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२**
**२. मा.अपर मुख्य सचिव, (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई -३२**
**३. आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.**
**४. संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,**
**५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे**
**६. सर्व संचालक/ सर्व सहसंचालक कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,**
**७. सर्व विभागीय कृषी सहसंचालक,**

८. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
९. सहाय्यक संचालक (लेखा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३. निवासी लेखा परिक्षाअधिकारी, मुंबई
१४. संचालक लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई ( २ प्रती)
१५. सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई - ३२,
१६.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१७. नियोजन विभाग,(कार्यासन -१४३१ ) मंत्रालय,मुंबई. /वित्त विभाग (व्यय-१) अर्थसंकल्प -३, १२,
१८.सर्व सह सचिव/सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,कृषी व फलोत्पादन विभाग,मंत्रालय
१९.निवड नस्ती (कार्यासन ९-अे)